मौलाना आझाद मोफत शिकवणी व संबध्द योजना या योजनेंतर्गत खाजगी प्रशिक्षण संस्थांना निधी उपलब्ध करून देण्याबाबत . सन २०१८-१९.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
**शासन निर्णय क्र. मोशियो-२०१८/प्र.क्र.८०/का-९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : १९ ऑक्टोबर, २०१८.**

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक: राअआ-२०१२/१०८/प्र.क्र.१८/का-९, दिनांक २५ जून, २०१३.
२) शासन निर्णय कमांक : मोशियो-२०१७/प्र.क्र.२४/का-९, दिनांक ११ ऑक्टोबर,२०१७.
३) शासन निर्णय, क्रमांक : मोशियो-२०१७/प्र.क्र.३३/का-९, दिनांक ३१ मार्च, २०१८
४) शासन निर्णय क्रमांक मोशियो-२०१८/प्र.क्र.५३/का-९, दिनांक ०५ मे, २०१८.
५) शासन निर्णय क्रमांक मोशियो-२०१७/प्र.क्र.१६६/का-९, दिनांक २१ मे, २०१८.
६) शासन निर्णय क्रमांक मोशियो-२०१८/प्र.क्र.३६/का-९, दिनांक २८ मे, २०१८.
७) शासन निर्णय क्रमांक मोशियो-२०१८/प्र.क्र.५३/का-९, दिनांक २८ मे, २०१८.
८) शासन निर्णय क्रमांक मोशियो-२०१८/प्र.क्र.८०/का-९, दिनांक ७ जुलै, २०१८.
९) शासन निर्णय क्रमांक मोशियो-२०१८/प्र.क्र.८०/का-९, दिनांक १ सप्टेंबर, २०१८.
१०) शासन निर्णय क्रमांक मोशियो-२०१७/प्र.क्र.१६६/का-९, दिनांक १ सप्टेंबर, २०१८.
११) शासन निर्णय क्रमांक मोशियो-२०१८/प्र.क्र.१२३/का-९, दिनांक १२ ऑक्टोबर, २०१८
१२)शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दिनांक ०२ एप्रिल,२०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक लोकसमूहातील उमेदवारांना शासकीय/निमशासकीय सेवेत संधी उपलब्ध करण्याकरिता केंद्रिय लोकसेवा आयोग/महाराष्ट्र लोकसेवा आयोग/बँकींग सेवा भरती इत्यादी स्पर्धा परीक्षांसाठी तसेच व्यावसायिक अभ्यासक्रमांमधील प्रवेशाकरिता घेण्यात येणाऱ्या सामाईक प्रवेश परीक्षांच्या पूर्व तयारीसाठी आणि इयत्ता १० वी व १२ वी अनुत्तीर्ण अल्पसंख्याक उमेदवारांकरिता विशेष शिकवणी वर्ग सुरू करण्याकरीता संदर्भ क्र. १ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. या योजनेंतर्गत राज्यातील मुंबई, नाशिक, अमरावती, नागपूर, ठाणे व पुणे या शहरांमध्ये अल्पसंख्याक उमेदवारांना प्रशिक्षण देण्यासाठी प्रशिक्षण केंद्रांची निवड संदर्भ क्र. २ अन्वये करण्यात आली आहे. उपरोक्त शासन निर्णयास अनुसरुन उपरोक्त प्रशिक्षण संस्थांमधील पुणे केंद्रावरील पुना गुजराती केळवणी मंडळ, पुणे या संस्थेस युपीएससी, एमपीएससी, एमपीएससी (अराजपत्रित), युथ एज्युकेशन ॲण्ड वेल्फेअर सोसायटी, नाशिक या संस्थेस सीईटी व अंजुमन हामी ए इस्लाम, नागपूर या संस्थेस सीईटी या अभ्यासक्रमाचे सन २०१७-१८ साठी दिलेल्या प्रशिक्षणाचा प्रथम टप्पा अनुदान उपरोक्त संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले आहे. आता उपरोक्त संस्थांनी उर्वरित टप्पा अनुदान मागणीचे प्रस्ताव सादर केले आहेत. सदर संस्थांस संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार टप्पा अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मौलाना आझाद मोफत शिकवणी व संबध्द योजनाा या योजनेंतर्गत शासन निर्णय, दिनांक २५.०६.२०१३ मधील तरतूदीची पूर्तता करणाऱ्या, ८५% उपस्थिती व पूर्व परीक्षा प्रवेशपत्र व सीईटी अभ्यासक्रमाचे गुणपत्रक प्राप्त विद्यार्थ्यांच्या

संख्येनुसार पुणे, नाशिक व नागपूर केंद्राकरीता अनुक्रमे पुना केळवणी गुजराती मंडळ, पुणे, युथ एज्युकेशन ॲण्ड वेल्फेअर सोसायटी, नाशिक व अंजुमन हामी-ए-इस्लाम, नागपूर या प्रशिक्षण संस्थांना सन २०१७-१८ युपीएससी, एमपीएससी, एमपीएससी (अराजपत्रित) व सीईटी या अभ्यासक्रमासाठीचे अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

त्यानुसार सन २०१८-१९ आर्थिक वर्षात उक्त योजनेसाठी अर्थसंकल्पीत केलेल्या रु.३.०० कोटीपैकी, संदर्भ क्र.१२ वित्त विभागाचे परिपत्रकानुसार ७०% प्रमाणात रु.२.१० कोटी निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. यापैकी संदर्भ क्र.४ च्या दिनांक ०५.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, रु.३२,६२,०००/-, संदर्भ क्र.५ च्या दिनांक २१.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, रु.११,२०,०००/-, संदर्भ क्र.६ च्या दिनाक २८.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, रु.२४,२५,०००/-, संदर्भ क्र.७ च्या दिनांक २८.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, रु.४२,०१,२५०/- व संदर्भ क्र.८, दिनांक ०७.०७.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, रु.१०,८०,०००/-, संदर्भ क्र.९ दि.०१.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, रु.१०,९४,५००/-, संदर्भ क्र.१० दि.०१.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, रु.१,३२,०००/- व संदर्भ क्र.११ दि.१२.१०.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, रु.९,६८,७५०/- असे एकूण रु.१,४२,८३,५००/- (अक्षरी रुपये एक कोटी बेचाळीस लक्ष त्र्याऐंशी हजार पाचशे पन्नास फक्त) अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे. सबब, उर्वरित रु.६७,१६,५००/- (अक्षरी रुपये सदुसष्ट लक्ष सोळा हजार पाचशे पन्नास फक्त) एवढे तरतूद वितरणासाठी उपलब्ध आहे. उपलब्ध तरतुदीमधून **परिशिष्ट-अ** मध्ये नमूद केल्याप्रमाणे पुना केळवणी गुजराती मंडळ, पुणे, युथ एज्युकेशन ॲण्ड वेल्फेअर सोसायटी, नाशिक व अंजुमन हामी-ए-इस्लाम, नागपूर या प्रशिक्षण संस्थांना **एकूण रु.१३,३७,०००/- (अक्षरी रुपये तेरा लक्ष सदोत्तीस हजार फक्त)** इतके अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तुत प्रकरणी सदर रक्कम आहरीत करण्यासाठी अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, नियंत्रण अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

२. सदर रकमेचा Electronic Clearing Service (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नावे काढण्यात यावा.

३. संबंधित प्रशिक्षण संस्थेने या बाबतचा वर्षनिहाय लेखाविषयक तपशिल ठेवावा. तसेच ज्या बाबींसाठी अनुदान वितरित करण्यात आले आहे त्या बाबींवरच खर्च करण्यात यावे. या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित प्रशिक्षण संस्थेने शासनास सादर करणे आवश्यक राहील. सदर बाबींचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास **परिशिष्ट-ब** येथे नमूद केल्याप्रमाणे सादर करणे बंधनकारक राहील. अल्पसंख्याक विकास विभागाचे अधिकारी संबंधित प्रशिक्षण संस्थेस भेट देतील. संस्थेने शासन निर्णय, दिनांक २५.०६.२०१३ मधील तरतुदीचे पालन केले नसल्याचे आढळून आल्यास संस्थेवर कारवाई करुन वितरीत अनुदान वसूल करण्यात येईल.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं- २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८ रोजीच्या परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ६ ते ८ व त्यासोबतच्या परिशिष्टामधील अटींची पूर्तता करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. यासाठी होणारा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र. झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१)(०१) मोफत शिकवणी व संलग्न योजना याकरीता सहायक अनुदान (२२३५ ए ०८९), (कार्यक्रम) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९११३७५५९२१४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.10.19 11:44:24 +05'30'

( दि.मा.सोनवणे )

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

अध्यक्ष / सचिव, संबंधित संस्था (पत्राने)

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. मंत्री / मा.राज्यमंत्री (अ.वि.) यांचे खाजगी सचिव,
४. महालेखापाल , १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, (प्रसिध्दीसाठी)
६. जिल्हाधिकारी, मुंबई.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी कार्यासन-७ / २ (रोखशाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मुंबई.
११.निवडनस्ती(कार्यासन-९)

**शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र. मोशियो-२०१८/प्र.क्र.८०/का-९, दि.१९ ऑक्टोबर, २०१८**

**परिशिष्ट - "अ"**

| अ. क्र. | संस्थेचे नांव व अभ्यासक्रम निहाय विद्यार्थी संख्या | अभ्यासक्रम व निवडवर्ष | मंजूर विद्यार्थी संख्या | ८५% उपस्थिती असलेल्या विद्यार्थ्यांची संख्या | संस्थांना अदा करण्यात यावयाची रक्कम / निधी | टप्पानिहाय देय अनुदान | एकूण अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | पुना गुजराती केळवणी मंडळ, पुणे केंद्र :- पुणे | केंद्रीय लोकसेवा आयोग सन २०१७-१८ करीता | २० | २० | रु.२५,००० प्रति उमेदवार किंवा संस्थेमार्फत आकारण्यात येणारी फी यापैकी जे कमी असेल ती रक्कम | पूर्व परीक्षेनंतर २५% (परीक्षा प्रवेशपत्र प्राप्त झालेल्या विद्यार्थी संख्येनुसार) = ८x२५०००x२५/ १००= ५०,०००/- | ५०,०००/- |
| | | राज्य लोकसेवा आयोग स्पर्धा परीक्षा सन २०१७-१८ करीता | २० | २० | रु.२०,००० प्रति उमेदवार किंवा संस्थेमार्फत आकारण्यात येणारी फी यापैकी जे कमी असेल ती रक्कम | पूर्व परीक्षेनंतर २५% (परीक्षा प्रवेशपत्र प्राप्त झालेल्या विद्यार्थी संख्येनुसार)= ९x२००००x२५/१००= ४५,०००/- | ४५,०००/- |
| | | राज्य लोकसेवा आयोग (अराजपत्रित) स्पर्धा परीक्षा सन २०१७-१८ करीता | २० | २० | रु.१५,००० प्रति उमेदवार किंवा संस्थेमार्फत आकारण्यात येणारी फी यापैकी जे कमी असेल ती रक्कम | पूर्व परीक्षेनंतर २५% (परीक्षा प्रवेशपत्र प्राप्त झालेल्या विद्यार्थी संख्येनुसार)= ८x१५०००x२५/१००= ३०,०००/- | ३०,०००/- |
| | | | | | | **एकूण** | **१,२५,०००/-** |
| २ | युथ एज्युकेशन ॲण्ड वेल्फेअर सोसायटी, नाशिक केंद्र :- नाशिक | सामाई प्रवेश परीक्षा सन २०१७-१८ करीता | ४० | ४० | रु.२०,००० प्रति उमेदवार किंवा संस्थेमार्फत आकारण्यात येणारी फी यापैकी जे कमी असेल ती रक्कम | प्रशिक्षणानंतर ६०% = ४०x२००००x६०/१००= ४,८०,०००/- | ४,८०,०००/- |
| | | | | | | अंतिम निकालानंतर ३०% (निकालपत्र प्राप्त संख्येनुसार)= ३२x२००००x३०/ १००=१,९२,०००/- | १,९२,०००/- |
| | | | | | | **एकूण** | **६,७२,०००/-** |
| ३ | अंजुमन हामी-ए-इस्लाम, नागपूर केंद्र :- नागपूर | सामाई प्रवेश परीक्षा सन २०१७-१८ करीता | ३० | ३० | रु.२०,००० प्रति उमेदवार किंवा संस्थेमार्फत आकारण्यात | प्रशिक्षणानंतर ६०% = ३०x२००००x६०/१००= ३,६०,०००/- | ३,६०,०००/- |
| | | | | | | अंतिम निकालानंतर ३०% (निकालपत्र प्राप्त | १,८०,०००/- |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | येणारी फी यापैकी जे कमी असेल ती रक्कम | संख्येनुसार) =३०x२००००x३०/१०० = १,८०,०००/- | |
| | | | | | | **एकूण** | ५,४०,०००/- |
| | | | | | | **एकूण** | १३,३७,०००/- |
| | **(अक्षरी रुपये तेरा लक्ष सदोत्तीस हजार फक्त)** | | | | | | |

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.10.19 11:44:43 +05'30'

( दि.मा.सोनवणे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र. मोशियो-२०१८/प्र.क्र.८०/का-९, दि. १९ ऑक्टोबर, २०१८.

**परिशिष्ट - "ब"**

**उपयोगिता प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक लोकसमूहातील उमेदवारांकरिता सुरू करण्यात आलेल्या **"मौलाना आझाद मोफत शिकवणी व संबध्द योजना"** या योजनेंतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.मोशियो-२०१८/प्र.क्र.८०/का-९, **दिनांक १९ ऑक्टोबर,२०१८** अन्वये वितरित केलेला रु. (अक्षरी रु. ) एवढा निधी पुढील अभ्यासक्रमासाठी उमेदवारांना शिकविण्यासाठी उपयोगात आणला आहे :-

| अभ्यासक्रमाचे नाव | विद्यार्थी संख्या | वर्ष | एकूण मंजूर अनुदान | खर्च |
|---|---|---|---|---|
| अ. | | | | |
| ब. | | | | |
| क. | | | | |
| ड. | | | | |

असेही प्रमाणित करण्यात येते की, **"मौलाना आझाद मोफत शिकवणी व संबध्द योजनेंतर्गत** ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पूर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधीचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे. तसेच केंद्र शासनाच्या योजनेतील विद्यार्थी व राज्य शासनाच्या योजनेतील विद्यार्थी यांची पुनरावृत्ती झालेली नाही, याची हमी देण्यात येत आहे. पुनरावृत्ती झाल्यास अनुदान राज्य शासनास परत करण्याची जबाबदारी संस्थेची राहील.

| संस्था अध्यक्ष यांची स्वाक्षरी | संस्था सचिव यांची स्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |

***